**नदीजोड अंतर्गत गुढे पाझर तलाव ते पथराड ल. पा. तलाव ता.भडगांव जि.जळगांव भरण कालवा सा.क्र. ० ते २०४० मी. चे भरण कालव्याच्या कामास रुपये रु.२८१.८२ लक्ष किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८/(२७९/२०१८)/लपा**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक:-२९/०३/२०२३

पहावे :-

१) जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, जळगाव यांचे पत्र क्र.जिनिस/जिवायो/नदीजोड/सुप्रमा/२०१७-१८/संस-५/२०८३, दिनांक १२/१०/२०१७.

२) जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, जळगाव यांचे पत्र क्र.जिनिस/जिवायो/नदीजोड/सुप्रमा-शेरेपूर्तता/संस-५/२०१९/१७५४, दिनांक २०/१०/२०२०.

३) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती, नाशिक यांचे पत्र जा.क्र.रातांसस-(१)/(कक्ष-१/६६०/२०२२, दिनांक ०२/०८/२०२२

४) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव जा.क्र.कासं/तापाविम/प्रशा-५/ ३५५१/सन-२०२२ दिनांक ०८/०९/२०२२.

प्रस्तावना:-

नदीजोड अंतर्गत गुढे पाझर तलाव ते पथराड ल. पा. तलाव ता.भडगांव जि.जळगांव सा.क्र. ० ते २०४० मी. भरण कालव्याव्दारे पावसाचे अतिरिक्त पुराचे वाहून जाणारे पाणी पथराड ल. पा. तलाव ता.भडगांव जि.जळगांव मध्ये सोडणे. सदर कामामुळे मौजे जुवार्डी, गुढे व पथराड गावातील पाणीटंचाई वर मात करण्यासाठी सिंचनाचा लाभ होणेसाठी भरणकालव्याचे काम करण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत नव्याने पाणीसाठा करणे समाविष्ठ नाही. शासन निर्णय क्र.संकीर्ण/२०१७/(१८७/२०१७) ल.पा.-१ मंत्रालय, मुंबई दिनांक २३/०८/२०१७ अन्वये नव्याने प्रस्तावित योजनांसाठी पाणी उपलब्धता प्रमाणपत्र घेणे अपेक्षित आहे. सदर योजनेचे कार्यरंभ आदेश- सन २००८-०९ व सन २०१६-१७ मधील असुन काम ६०% पूर्ण झालेले आहे, त्यामुळे नव्याने पाणीसाठा होत नसल्याने प्रमाणपत्राची आवश्यकता नाही.

जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हानियोजन समिती, जळगांव यांचे पत्र क्र.जिनिस/जिवायो/०८-०९ व २००९-१०/लपा/प्रमा, दिनांक ०२/०३/२००९ अन्वये रू.९१.०५ लक्ष किंमतीस दरसूची सन २००८-०९ नुसार मुळ प्रशासकीय मान्यता दिलेली होती. संदर्भाधीन पत्रान्वये जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हानियोजन समिती, जळगांव यांनी नदीजोड अंतर्गत गुढे पाझर तलाव ते पथराड ल. पा. तलाव ता.भडगांव जि.जळगांव भरण कालवा सा.क्र. ० ते २०४० मी. रुपये रु.२८१.८२ लक्ष किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव दरसूची सन २००८-०९ व दरसूची सन २०१६-१७ नुसार शासनास मान्यतेस्तव सादर केला होता.

यासाठी योजनेचे दरसूची सन २००८-०९ वर आधारीत रु.२८१.८२ लक्ष इतक्या किंमतीचा प्रस्तावावर संदर्भाधीन क्र.३ अन्वये "रू.५ कोटी किंमती पेक्षा कमी किंमतीचे अंदाजपत्रकांना राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती कार्यालय करित असलेल्या छाननी प्रमाणे महामंडळस्तरावर छाननी करून सदर छाननी अहवालासहित कार्यकारी संचालक यांच्या शिफारशीने थेट शासनास सादर करावेत. त्याप्रमाणे प्रस्ताव संदर्भाधीन क्र.४ नुसार प्राप्त झाला होता.

या योजनेच्या किमतीत झालेली वाढ ही पुढील बाबींमुळे झाली आहे भुसंपादन किंमतीतील वाढ हि भूसंपादन कायदा सन २०१३ मुळे झालेली आहे, हेड रेग्युलेटर, आरएचटी वर्क्स, रस्ते-पुल व माती कामातील मधील वाढ १% विमा इत्यादीमुळे झालेली आहे. प्रकल्पास दरसूची सन २००८-०९ वर आधारित रु.२८१.८२ लक्ष इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय खालीलप्रमाणे घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नदीजोड अंतर्गत गुढे पाझर तलाव ते पथराड ल. पा. तलाव ता.भडगांव जि.जळगांव भरण कालवा सा.क्र. ० ते २०४० मी. या कामास दरसूची सन २००८-०९ वर आधारित रु.२८१.८२ लक्ष (दोन कोटी एक्याऐंशी लक्ष व ब्याऐंशी हजार फक्त) इतक्या किंमतीस खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर योजना पूर्ण झाल्यावर सिंचन व्यवस्थापणाकडे हस्तांतरीत करण्याची कार्यवाही पूर्ण करावी.
२) प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.
३) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.
४) संपूर्ण प्रकल्प हा प्रस्तावित प्रथम सु. प्र. मा. किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.
५) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तसेच सुधारित प्रशासकीय मान्यता देणारे प्राधिकारी हे झालेल्या क्षेत्रीय निर्णयास व अनियमिततेस जबाबदार नसतील याबाबतची जबाबदारी निर्णय घेणाऱ्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील, अशा तांत्रीक व निविदा विषयक प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक राहील.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक "O-४०, २७०२ लहान पाटबंधारे, ०१ भूपृष्ठ जल ८०० इतर खर्च (४४) जिल्हा योजना-जळगांव (४४) (०५) नद्या व कालवे जोडून भूजल पातळी वाढविणे २७०२८०१६-२७, लहान बांधकामे" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

नियोजन विभागाच्या क्रमांक ससमा-२०१०/प्र.क्र. ४८(भाग-१) का १४६१, दिनांक ११/०६/२०१८ नुसार रुपये १५ कोटी किंमतीच्या खालील प्रत्येक कामास मंजूरी देण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागास आहेत.सदर शासन निर्णयात दिलेल्या अधिकारानुसार जलसंपदा या प्रशासकीय विभागाच्या तसेच मा.उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांच्या मान्यतेने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २५० या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२९२००४२८८२२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.29 20:43:52 +05'30'

**(अमोल फुंदे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

सहपत्र :- परिशिष्ट "अ"

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्ष नेते, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१४. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१५. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, जळगांव.
१६. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. मुख्य अभियंता (जसं), तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
१८. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. अधीक्षक अभियंता, जळगांव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगांव.
२०. अर्थ शाखा -१ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. ल.पा. कार्यासन (संग्रहार्थ).

**परिशिष्ट-अ**

**नदीजोड अंतर्गत गुढे पाझर तलाव ते पथराड ल. पा. तलाव ता.भडगांव जि.जळगांव भरण कालवा सा.क्र. ० ते २०४० मी. या कामास प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१८/(२७९/२०१८)/लपा, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक:-२९/०३/२०२३

| **अ.क्र.** | **बाब** | मुळ प्रमा दरसूची सन २००८-०९ रु.लक्ष | प्रथम सुप्रमा दरसूची सन २००८-०९ व सन २०१६-१७ रु.लक्ष | झालेली वाढ /बचत रु.लक्ष | वाढीची टक्केवारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | बी-भुसंपादन | ५.६७ | ९७.५५ | ९१.८८ | १००.९१% |
| २ | डी- हेड रेग्युलेटर | १.०६ | ४.७५ | ३.६९ | ४.०५% |
| ३ | एफ-आरएचटी वर्क्स | ५.५१ | २२.५६ | १७.०५ | १८.७३% |
| ४ | जी- रस्ते व पुल | ६.०० | १४.०९ | ८.०९ | ८.८९% |
| ५ | एल- मातीकाम | ७२.८१ | १४०.०८ | ६७.२७ | ७३.८८% |
| ६ | १ %विमा | ०.०० | २.७९ | २.७९ | ३.०६% |
| | **एकूण** | **९१.०५** | **२८१.८२** | **१९०.७७** | **२०९.५२%** |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.29 20:44:14 +05'30'

**(अमोल फुंदे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन